संगणक सांकेतांक नंबर - 202207302099824896

मूल्यमापन पाहणी, नमुना सर्वेक्षण व सांख्यिकी सल्ला विषयक सेवा ही कामे करण्यासाठी नियोजन विभाग, शासन निर्णय दिनांक २२ जुलै, २०१६ मधील नामिका सूचीतील संस्थांना कामे देण्याचे स्थगित करणेबाबत

महाराष्ट्र शासन

नियोजन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : मुमाअ-१०१६/प्र.क्र.७८ (भाग-२)/का-१४१७

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: ३० जुलै, २०२१

वाचा: नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.मुमाअ-१०१६/प्र.क्र.७८/का-१४१७, दिनांक २२-७-२०१६

परिपत्रक:

नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक वियोमू-११९८/प्र.क्र.६/का-१४१३, दिनांक ३० सप्टेंबर, १९९८ अन्वये राज्यातील विविध प्रशासकीय विभागाचे विकास योजनांचे / कार्यक्रमाचे मूल्यमापन विषयक अभ्यास करण्यात येतात. राज्यामध्ये राबविण्यात येत असलेल्या विविध प्रशासकीय विभागाचे एकूण विकास योजनांच्या तुलनेत मूल्यमापन अभ्यासाकरीता अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडून हाती घेण्यात येणा-या योजनांची संख्या अतिशय नगण्य आहे. सदरची बाब विचारात घेऊन विविध प्रशासकीय विभागामार्फत राबविण्यात येणा-या जास्तीत जास्त योजनांचा मूल्यमापन अभ्यास घेण्यात यावा म्हणून नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक मुमाअ-१०१६/प्र.क्र.७८/का-१४१७, दिनांक २२ जुलै, २०१६ अन्वये विविध प्रशासकीय विभागाच्या विकास योजना मूल्यमापनासाठी नामांकित २४ बाह्यस्थ संस्थांची "नामिका सूची" (Empanelment List) तयार करण्यात आली आहे. सामंजस्य करार न झाल्याने या नामिका सूचीतील (i) National Council of Applied Economic Research (NCEAR), New Delhi व (ii) JPs Associates Pvt. Ltd. Delhi या दोन संस्थांना दिनांक २७ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयानुसार आणि (iii) Centre for Operations Research and Training (CORT), Vadodara या संस्थेस दिनांक २९ ऑक्टोबर, २०२० च्या शासन निर्णयानुसार "नामिका सूची" (Empanelment List) मधून वगळण्यात आले आहे.

२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक मुमाअ-१०१६/प्र.क्र.७८/का-१४१७, दिनांक २२ जुलै, २०१६ च्या परिशिष्ट-१ मधील "नामिका सूची" (Empanelment List) मध्ये शिल्लक राहीलेल्या २१ बाह्यस्थ संस्थांना ५ वर्षाचा कालावधी पूर्ण झालेला आहे. या "नामिका सूची" (Empanelment List)

मधील २१ बाह्यस्थ संस्थांकडून पुढील कालावधीसाठी सहमती आहे किंवा कसे याबाबतचे अभिप्राय प्राप्त करणे तसेच "नामिका सूची" (Empanelment List) मध्ये नवीन संस्थांची नावे समाविष्ट करणे याबाबतची पुढील कार्यवाही अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत सुरू करण्यात आलेली आहे. सबब उपरोक्त शासन निर्णयातील समाविष्ट संस्थांचा आढावा पूर्ण होईपर्यंत नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक मुमाअ-२०१६/प्र.क्र.७८/का-१४१७ दिनांक २२ जुलै, २०१६ च्या परिशिष्ट-१ मधील वगळण्यात आलेल्या ३ बाह्यस्थ संस्था वगळून उर्वरित शिल्लक राहीलेल्या "नामिका सूची" (Empanelment List) मधील २१ बाह्यस्थ संस्थांना नव्याने (i) मूल्यमापन पाहणी, (ii) नमुना सर्वेक्षण व (iii) सांख्यिकी सल्ला विषयक सेवा ही कामे देण्यात येऊ नयेत.

(दिपक देसाई)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा / विधान परिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
३) मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
४) मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई (सदर शासन निर्णय आपल्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यालये, मंडळे, महामंडळे, अंगिकृत उपक्रम यांच्या निदर्शनास आणावा).
६) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
७) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)*
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
९) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) प्रादेशिक सहसंचालक (सर्व), अर्थ व सांख्यिकी संचालनालय*
१३) उपायुक्त (नियोजन) (सर्व), विभागीय आयुक्तांचे कार्यालय,
१४) जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व), जिल्हाधिकारी कार्यालय,
१५) जिल्हा सांख्यिकी अधिकारी (सर्व), जिल्हा सांख्यिकी कार्यालय*
१६) नियोजन विभाग, सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
१७) संबंधीत संस्था (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत)
१८) निवड नस्ती (का. १४१७)

*अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत